# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक दुरुस्ती-०५१८/प्र.क्र.२१८/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २० जून २०१८.

**विषय** :- राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.३, जालना येथील प्रकार-१ च्या १२० व प्रकार-२ च्या १८० अशा एकूण ३०० सेवा निवासस्थानांमध्ये विवक्षित विद्युतविषयक कामे करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ रारापोबल-जालना/ वि.संच-दुरुस्ती (३७१-०९)/ १०३/ २०१८, दिनांक २८.०३.२०१८.

**ज्ञापन.-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाने राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.३, जालना येथील प्रकार-१ च्या १२० व प्रकार-२ च्या १८० अशा एकूण ३०० सेवा निवासस्थानांमध्ये पुढील विद्युतविषयक काम करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे:-

| कामाचे नाव<br>*(१)* | खर्चाचे अंदाज<br>*(२)* |
|---|---|
| *"Providing renovation of E.I. work in 120 Nos. (Type-1) and 180 Nos. (Type-2) residential quarters at S.R.P.F. camp, Jalna (District-Jalna)."* | रु.५७,५७,७८०/- |

२. उक्त खर्चाचे अंदाज हे उपअभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत उपविभाग, जालना, यांनी सन २०१७-१८ च्या दरसूचीनुसार तयार केले आहेत. उक्त खर्चाचे अंदाज हे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग, औरंगाबाद, आणि समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.३, जालना, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.६४,४८,७१४/-** असे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.३, जालना येथील प्रकार-१ च्या १२० व प्रकार-२ च्या १८० अशा एकूण ३०० सेवा निवासस्थानांमध्ये, परिच्छेद १ मधील तक्त्यातील स्तंभ (१) मध्ये नमूद केलेले विद्युतविषयक काम करण्यासाठी **रु.६४,४८,७१४/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करु नये या अटीवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००)(०१) जिल्हा पोलीस बल (अनिवार्य) *(दत्तमत)* (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०७/इमा-२, दिनांक ०८.०६.२०१८, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०६२०१२१४०६२३२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2018.06.20 12:15:50 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, नागपूर.
४) समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.३, जालना,

**प्रत:-**

१) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग, औरंगाबाद *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारित केलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
२) जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
६) निवड फाईल (पोल-७).